**अनलॉक ५ अंतर्गत शिवभोजन केंद्र चालक व ग्राहक यांचेसाठी मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक - शिभोथा-२०२०/प्र.क्र.१३२/नापु-१७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २१ ऑक्टोबर, २०२०

वाचा :- १) शासन निर्णय क्र. शिभोथा-२०१९/प्र.क्र ५१/नापु-१७, दि. ०१ जानेवारी, २०२०.
२) शासन परिपत्रक क्र. शाभोथा-२०१९/प्र.क.५१/ नापु १७, दि. १८ जानेवारी, २०२०
३) शासन परिपत्रक क्र. शाभोथा-२०१९/प्र.क.५१/ नापु १७, दि. २८ मार्च, २०२०
४) शासन परिपत्रक क्र. शाभोथा-२०१९/प्र.क.५१/ नापु १७, दि. १७ ऑगस्ट, २०२०

परिपत्रक :-

अनलॉक ५ ची प्रक्रिया देशभर सुरु झाली आहे. राज्य शासनाने दि. ०५.१०.२०२० पासून उपहारगृहे, हॉटेल यांना ५०% आसन क्षमतेसह सुरु करण्यास परवानगी दिली आहे. त्यास अनुसरुन शिवभोजन केंद्राविषयी मार्गदर्शक सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालील प्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

१) शिवभोजन केंद्रामध्ये बसण्याच्या व्यवस्थेत बदल करुन दोन टेबल्स मध्ये किमान एक मीटरचे अंतर राहील अशी व्यवस्था करावी.
२) शिवभोजन केंद्रावर ३ फूट सामाजिक अंतराच्या नियमांचे कसोशीने पालन करावे.
३) शिवभोजन तयार करणाऱ्या तसेच वाटप करणाऱ्या कर्मचाऱ्यांनी वारंवार साबणाने हात धुवावेत.
४) शिवभोजन केंद्रातील कर्मचाऱ्यांनी मुखपट्टी (मास्क) वापरणे बंधनकारक राहील.
५) दररोज संपूर्ण शिवभोजन केंद्र निर्जंतूक करावे.
६) शिवभोजन केंद्रात हवा खेळती राहील याची काळजी घ्यावी.
७) शिवभोजन केंद्रात वापरात येणारी ताट, वाटी, चमचे, पेला इ. सर्व भांडी निर्जंतूक करुन घ्यावी.
८) शिवभोजन केंद्रात शक्य असल्यास प्रवेशासाठी आणि बाहेर जाण्यासाठी वेगवेगळे मार्ग ठेवावेत.
९) ग्राहकांना हात धुण्यासाठी साबण, तसेच हात निर्जंतुकीकरणासाठी सॅनिटायझर उपलब्ध करुन द्यावे.
१०) प्रत्येक ग्राहकाची थर्मल गनने तपासणी करावी. शरीराचे तापमान १०० डिग्री फॅरनहाईटपेक्षा अधिक आढळल्यास त्या ग्राहकास शिवभोजन थाळी take away स्वरुपात निर्जंतूकीकरणाचे सर्व नियम पाळून उपलब्ध करून द्यावी.

११) ज्या ग्राहकांना take away (पार्सल) हवे असेल त्यांना त्याप्रमाणे निर्जंतुकीकरणाचे नियम पाळून उपलब्ध करुन द्यावे.

१२) शिवभोजन केंद्रात भोजन करण्याव्यतिरिक्तच्या काळात ग्राहकांनी मुखपट्टी (मास्क) वापरणे बंधनकारक राहील.

उपरोक्त सूचना तात्काळ अमलात येतील याची सर्व संबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२०१०२११४४६२४४४०६ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Charushila Chandrakant Tambekar

Digitally signed by Charushila Chandrakant Tambekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies and Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=332dfd6e6db0a06570cca25f9c39add2bebc7d207b3405d11e474330d0a9e014, serialNumber=2b0496c0c213a3f50c6522cc39ae5de95e1150ac3287e89c21b1422e313820a2, cn=Charushila Chandrakant Tambekar
Date: 2020.10.21 14:48:03 +05'30'

**( चारुशीला तांबेकर )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मंत्री (अनापुग्रासं) यांचे खाजगी सचिव
२) सचिव (अनापुग्रासं) यांचे स्वीय सहायक
३) सर्व जिल्हाधिकारी
४) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई
५) वित्तीय सल्लागार व उपसचिव (अनापुवग्रासं) पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई
६) सर्व (उपायुक्त) पुरवठा
७) सर्व उपनियंत्रक, शिधावाटप
८) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
९) सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
१०) सर्व तहसीलदार
११) सर्व गट विकास अधिकारी
१२) सर्व मुख्याधिकारी
१३) निवड नस्ती (कार्यासन नापु १७).